म्हणजे पावसाळ्यांत चार महिने रहावें. मनाचें नियमन करणाऱ्या यतींनीं आठ महिने भ्रमण करावें. महाक्षेत्रांत राहणाऱ्यांनीं भ्रमण करूं नये. भिक्षाटन, जप, स्नान, ध्यान, शुचिर्भूतपणा व देवपूजन हीं सहा राजदंडाप्रमाणें अवश्य करावींत. मंचक, श्वेतवस्त्र, स्त्रियांच्या गोष्टी, चंचलता, दिवसास निद्रा व वाहन हीं सहा कृत्यें यतींस पापी बनविणारीं आहेत. वृथा भाषण, पात्रलोभ, संचय, शिष्यसंग्रह, हव्य, कव्य व तसेंच अन्न हीं यतीनें वर्ज्य करावींत. यतीचीं पात्रें मृत्तिका, वेणु, काष्ठ व भोंपळा, यांचीं होत. संन्याशानें नित्य तीर्थवासी व तसेंच उपवासतत्पर असूं नये. संन्याशानें अध्ययन करूं नये व व्याख्यान देऊं नये. म्हणजे वेदार्थाहून भिन्न विषयांचें अध्ययन करूं नये व वेदार्थाहून भिन्न विषयांवर व्याख्यान देऊं नये. असें हे यतिधर्म संक्षेपानें सांगितले. दुसरेही यतिधर्म माधव व मिताक्षरा या ग्रंथांत पाहावेत.

**ग्रंथोपसंहारः । प्रथमेऽत्रपरिच्छेदेकालसामान्यनिर्णयः । द्वितीयेथपरिच्छेदेविशेषात्कालनिर्णयः ॥ १ ॥ तृतीयस्यचपूर्वार्धेगर्भाधानादिसंस्क्रियाः । आह्निकंचप्रकीर्णार्थाआधानाद्याः सविस्तराः ॥ २ ॥ देवप्रतिष्ठाशान्त्यादि नित्यंनैमित्तिकंतथा । तार्तीयकोत्तरार्धेस्मिन्नजीवत्पितृकनिर्णयः ॥ ३ ॥ श्राद्धाधिकारकालादेर्निर्णयःश्राद्धपद्धतिः । सूतकादेर्निर्णयश्चनिर्णयोदुर्मृतावपि ॥४॥ अन्त्येष्टिसंस्कारविधिःसंन्यासःसहविस्तरः । प्रायश्चित्तंव्यवहृतिंसर्वदानविधिंविना ॥ ५ ॥ कृत्स्नोपिधर्मशास्त्रार्थःसंक्षेपेणात्रनिर्मितः । विबुधानांचबालानां तुष्टये कष्टहानये ॥ ६ ॥ मूलभूतानिपद्यानिविकृतानिक्वचित्क्वचित् । निर्विकाराण्यपिनवान्यप्युक्तान्यत्रकानिचित् ॥ ७ ॥**

**ग्रन्थोपसंहार**—या धर्मांब्धिसार ग्रंथाच्या पहिल्या परिच्छेदांत कालाचा सामान्य निर्णय सांगितला, दुसऱ्या परिच्छेदांत विशेषतः कालनिर्णय सांगितला, तिसऱ्या परिच्छेदाच्या पूर्वार्धांत, गर्भादानादि संस्कार, आन्हिक आधान इत्यादि सविस्तर मिश्रविषय, देवप्रतिष्ठा, शांत्यादिक व नित्यनैमित्तिक कर्में इतके विषय सांगितले व तिसऱ्या परिच्छेदाच्या उत्तरार्धांत जीवत्पितृकाचा निर्णय, श्राद्धाधिकार, काल इत्यादिकांचा निर्णय श्राद्धपद्धति, सूतकादिकांचा निर्णय, दुर्मरण असतांही निर्णय, अंत्येष्टिसंस्कारादि विधि व विस्तारसहित संन्यास, असे विषय सांगितले. विद्वानांच्या संतोषार्थ व शास्त्रव्युत्पत्ति नसणाऱ्या अज्ञान्यांचें शास्त्राज्ञानुरूप कष्ट दूर व्हावे म्हणून या ग्रंथांत प्रायश्चित्त, व्यवहार व सर्व दानांचा विधि, यांशिवाय सर्वही धर्मशास्त्रार्थ संक्षेपतः सांगितला आहे. मूळचे श्लोक क्वचित् क्वचित् अशुद्ध असल्यानें या ग्रंथांत कित्येक नवेही श्लोक शुद्ध करून लिहिले आहेत.

**मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोनलसाबुधाः । कृतकार्याःप्राग्निबन्धैस्तदर्थंनायमुद्यमः ॥ ७ ॥ येपुनर्मन्दमतयोलसाअज्ञाश्चनिर्णयम् । धर्मेवदितुमिच्छन्ति रचितस्तदपेक्षया ॥९॥ निबन्धोयंधर्मसिन्धुसारनामासुबोधनः । अमुनाप्रीयतां श्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ॥ १० ॥**

**ग्रन्थप्रयोजन**—मीमांसा व धर्मशास्त्र जाणणारे लोक बुद्धिमान् व निरलस पंडित महाविद्वान् यांनीं केलेले पूर्वींचे ग्रंथ पाहून कृतकार्य होतात, म्हणून माझा हा ग्रंथ करण्याचा उद्योग त्यांच्याकरितां नाहीं. तर जे मंदबुद्धि, आळशी व अविद्वान् असून धर्माचे बाबतींत निर्णय जाणण्याची इच्छा करितात अशांच्यासाठीं मीं हा धर्मसिंधुसार नांवाचा सुबोधग्रंथ केला आहे; या ग्रंथानें भक्तवत्सल श्रीमद्विठ्ठल संतुष्ट असो.

प्रेम्णासद्भिर्ग्रन्थःसेव्यःशब्दार्थतःसदोषोपि । संशोध्यवापिहरिणासुदाममुनिसतुषपृथुकमुष्टिरिव॥ श्रीकाश्युपाध्यायवरोमहात्माबभूवविद्वद्द्विजराजराजः। तस्माद्धुपाध्यायकुलावतंसोयज्ञेश्वरोनन्तइमावभूताम्॥यज्ञेश्वरोयज्ञविधानदक्षो-दैवज्ञवेदाङ्गसुशास्त्रशिक्षः।भक्तोत्तमोनन्तगुणैकधामानन्ताह्वयोनन्तकलावतारः॥ एषोत्यजज्जन्मभुवंस्वकीयांतांकौङ्कणाख्यांसुविरक्तिशाली । श्रीपाण्डुरङ्गेवसतिंविधायभीमातटेमुक्तिमगात्सुभक्त्या ॥

**ग्रन्थकारकुलनिवेदन**—माझा ग्रंथ क्वचित् स्थळीं शब्दार्थानें जरी सदोष असला तरी कोंड्यानें युक्त असलेले सुदाम्याचे पोहे जसे श्रीहरीनें चांगले शुद्ध करून भक्षण केले त्याप्रमाणें हा माझा ग्रंथ विद्वानांनीं विचारपूर्वक शोध करून प्रेमानें स्वीकारावा. विद्वान् ब्राह्मणांत केवळ सार्वभौम असे जे महात्मे श्रीकाश्युपाध्याय होऊन गेले त्यांच्यापासून उपाध्यायकुलावतंस असे यज्ञेश्वरोपाध्याय व अनंतोपाध्याय असे दोन पुत्र झाले. त्यांत श्रौतमार्गांत निष्णात, ज्योतिषी आणि वेदांगाचें जें उत्तम शास्त्र व्याकरण, त्यांत चांगले पढलेले असे यज्ञेश्वरोपाध्याय होते. भक्तांत श्रेष्ठ असून अनंताचा अंशभूत अवतार असल्यानें अनंत गुणांचें वसतिस्थान असे अनंतोपाध्याय होते. अनंतोपाध्याय वैराग्यशाली होते. त्यांनीं आपली कोंकण नांवाची जन्मभूमि सोडून व श्रीपंढरीक्षेत्रांत श्रीपांडुरंगाच्याजवळ वास्तव्य करून, पांडुरंगाच्या भक्तीनेंच भीमानदीच्या तटाकीं ते मुक्तिप्रत जाते झाले.

तस्यानन्ताभिधानस्योपाध्यायस्यसुतःकृती । काशीनाथाभिधोधर्मसिन्धुसारंसमातनोत् ॥

**ग्रंथकारनामाभिधान**—त्या अनंतोपाध्यायांचा काशिनाथ नामक जो पुत्र त्यानेंच हा धर्मसिंधुसार नांवाचा ग्रंथ रचिला आहे.

**इतिश्रीमत्काश्युपाध्यायसूरिसूनुयज्ञेश्वरोपाध्यायानुजानन्तोपाध्यायसूरिसुतकाशीनाथोपाध्यायविरचितधर्मसिन्धुसारेतृतीयपरिच्छेदोत्तरार्धसमाप्तम् ॥**

**ग्रन्थसमाप्ति**—काश्युपाध्याय सूरींचा पुत्र जो यज्ञेश्वरोपाध्यायसूरिचा त्यांचे धाकटे बंधु जे अनन्तोपाध्यायसूरि त्यांच्या काशीनाथ नामक पुत्रानें जो धर्मसिन्धुसार नांवाचा ग्रन्थ लिहिला, त्या ग्रन्थाचा उत्तरार्ध येथें समाप्त झाला.

**॥ श्री गुरुपांडुरङ्गार्पणमस्तु ॥**

**॥ श्रीगुरुपांडुरंगाला हा ग्रन्थ अर्पण असो ॥**

---

## भाषान्तरकाराची सज्जनविज्ञप्ति

अमन्त्र तें अक्षर नाहिं ऐसें। जायु प्रतीमूळि वसेच तैसें ॥
अयोग्य तो पूरुष नाहिं ऐसा। त्यां पाहिजे योजक मात्र तैसा ॥ १॥

तो दोषि तो कुटिल तो सम तो कलंकी।
मित्रावसानसमयीं उदयस्थ लोकीं ॥
तो चन्द्र मस्तकिं शिव प्रियसा विलोकी।
साह्यांत थोर गुणदोष नः पाहती कीं ॥ २ ॥

दाता परोपकृतिनिर्भरचित्त ऐसा।
दूरी समीप न च भाव तयासि तैसा ॥
भानु प्रफुल्ल करि पंक्ति सरोरुहांची।
पाणिस्थ पंकज तशी भुवनान्तरीची ॥ ३ ॥

कर्मा कराया प्रभु इच्छि जेव्हां।
साह्यार्थ कोणी नलगेचि तेव्हां ॥
पांचालजेच्या पटसंविधानीं।
वेमातुरी चालविल्या न कोणी ॥ ४ ॥

दोषांप्रती साधुसुवृत्ति ल्याया। ज्ञात्यांप्रती प्रार्थि क्षमा कराया ॥
आज्ञेप्रती द्या मज मत्कृतीला। धर्माप्रती कर्म समर्पिण्याला ॥५॥

